संगणकाचे आवश्यक सुटे भाग खरेदी करण्यासाठी पुरवठादाराची नियुक्ती करण्याबाबत-

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन आदेश क्रमांक : खरेदी-२०२२/प्र.क्र.१९/नोंदणी शाखा**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक : १५ मार्च, २०२३

<u>संदर्भ</u> : १. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक : भांखस-२०१४/प्र.क्र.८२/-भाग-III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६

२. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/-उद्योग-४, दिनांक २४ डिसेंबर, २०१७

३. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक : भांखस-२०२१/प्र.क्र.८/-उद्योग-४, दिनांक ७ मे, २०२१

४. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाची क्रमांक : खरेदी-२०२२/प्र.क्र.१९/नोंदणी शाखा, दिनांक १६ डिसेबर, २०२२ रोजीची दरपत्रक सूचना

५) शासन आदेश क्रमांक : खरेदी-२०२२/प्र.क्र.१९/नोंदणी शाखा, ०८ फेब्रुवारी,२०२३

**शासन आदेश :-**

शालेय शिक्षण व क्रीडा (खुद्द) विभागाकरिता आवश्यक असणारे संगणकाचे सुटे भाग खरेदी करण्यासाठी पुरवठादारासोबत एक वर्षाचा करार करण्याकरिता पुरवठादारांची निवड संदर्भाधीन क्रमांक ५ वरील दिनांक ०८ फेब्रुवारी,२०२३ च्या शासन आदेशान्वये करण्यात आली आहे. त्यानुसार कि बोर्ड व माऊस आणि टोनर काट्रेजसाठी मे. वेदांत एण्टरप्रायजेस यांची पुरवठादार म्हणून निवड करण्यात आली होती. तथापि, मे. वेदांत एण्टरप्रायजेस यांनी सदर वस्तुंचा पुरवठा करण्यासाठी शासनाशी करार करण्यात स्वारस्य न दाखविल्याने त्यांचेऐवजी निविदा प्रक्रीयेत दुस-या क्रमांकाचे (एल-२) पुरवठादार पारस स्टेशनरी आणि झेरॉक्स यांची (कि-बोर्ड व माऊस)कोम्बो पुरवठादार म्हणून निवड करण्यात येत आहे.

२. उपरोक्त पुरवठादाराची निवड खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात आली आहे.

i. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (खुद्द) साठी चांगल्या दर्जाचे संगणकाचे सुटे भाग पुरविण्याचा कालावधी दिनांक १ जानेवारी, २०२३ ते दिनांक ३१ डिसेंबर, २०२३ इतका राहील.

ii. विभागामार्फत वेळोवेळी नोंदविलेल्या मागणीनुसार व निविदेमध्ये नमूद केलेल्या कंपनीचे अथवा त्यापेक्षा चांगल्या दर्जाचे सुटे भागांचा पुरवठा दरकरारात नमूद केलेल्या दराने तातडीने पुरविणे बंधनकारक असेल.

iii. विभागाने आवश्यकतेनुसार मागणी केल्यावर मागणी केलेली संगणकांचे सुटे भाग निश्चित केलेल्या दराने व दर्जानुसार पुरवठा करणे पुरवठादारास बंधनकारक राहील. पुरविण्यात आलेल्या सुटे भागाच्या दर्जात अथवा किंमतीत कोणताही बदल केल्यास,

सदर वस्तू नाकारणे तसेच करारनाम्याचे पालन समाधानकारक न झाल्यास करारनामा संपुष्टात आणणे, याबाबत विभाग जो निर्णय घेईल तो पुरवठादारस मान्य राहील.

iv. यादीमध्ये नमूद केलेल्या वस्तूंव्यतिरिक्त इतर वस्तुंची विभागास तातडीने आवश्यकता असल्यास, सदर वस्तूंची मागणी नोंदविल्यानंतर, ती तातडीने पुरवणे बंधनकारक असेल. तसेच अशा वस्तू बाजारभावाच्या किंमतीपेक्षा (एम. आर.पी.) ५ टक्के कमी दराने पुरवठा करणे पुरवठादारास बंधनकारक राहील.

v. पुरवठादारांने नमूद केलेल्या वस्तूंचे दर हे जीएसटी व्यतिरिक्त असल्यामुळे संबंधित वस्तूंना अनुज्ञेय असलेला जीएसटी दर अतिरिक्त अदा करण्यात येईल.

३. या संदर्भात पारस स्टेशनरी आणि झेरॉक्स या संस्थेसोबत १०० रुपयांच्या मुद्रांक कागदावर (Stamp paper) करारनामा करण्यात यावा.

४. हे शासन आदेश, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग एक, उपविभाग दोन, अनुक्रमांक १, नियम २ व ७ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासननिर्णय, दिनांक ३० ऑक्टोबर, २०१५ व दिनांक ७ मे, २०२१ मधील विहित अटी व शर्तींचे पालन करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२३०३१५१४२९५२२८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TIKARAM WAMAN KARPATE

Digitally signed by TIKARAM WAMAN KARPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=340ec5e34f4f31b01be0869a230e89b14739b1c38b24cff0edd0f8088e0c342a,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=9395C596B57A69FE04109B8C8191E7389CFF5EDA3FAC16C6F8263BE7FBBD319D,
cn=TIKARAM WAMAN KARPATE
Date: 2023.03.15 14:38:57 +05'30'

**(टि. वा करपते)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सर्व सह सचिव / उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व कोषागारे कार्यालय, मुंबई
५. पारस स्टेशनरी आणि झेरॉक्स , शॉप नं. ११, गुंदेजा चेंबर्स ९, एन.एम.रोड, फोर्ट, मुंबई- ४०० ००१.
६. निवड नस्ती / नोंदणी शाखा.